# जन वाचन आंदोलन
## *बाल पुस्तकमाला*

"पुस्तकात चिमण्या किलबिलत असतात
पुस्तकात शेतं डुलडुलत असतात
पुस्तकात झरे गुणगुणत असतात
पऱ्यांच्या कथा सांगत असतात
पुस्तकात रॉकेटचं राज्य आहे
पुस्तकात विज्ञानाचं साम्राज्य आहे
पुस्तकांची केवढी मोठ्ठी दुनिया आहे
पुस्तकात ज्ञानाचा चनियामनिया आहे
तुम्हाला पुस्तकांच्या दुनियेत जावंसं वाटतंय् ना ?
पुस्तकांना तुमच्याशी गप्पा मारायच्या आहेत
पुस्तकांना तुमच्यापाशी रहायचं आहे.

मूळ हिंदी कविता - **सफदर हाश्मी**



ही एक सदाबहार गोष्ट आहे. चिमणीचं छोटसं पिल्लू घरट्यातून खाली पडतं. मग ते आपल्या आईला शोधायला बाहेर पडतं. वाटेत त्याला अनेक गमतीदार अनुभव येतात आणि शेवटी जेव्हा ते त्याच्या घरट्यात पुन्हा पोचतं तेव्हा त्याची आईपण त्याला शोधत घरट्यात येते आणि मायलेकांची भेट होते.

A children's classic. A baby bird falls from its nest and is separated from his mother. The baby bird goes looking for his mother. On the way he encounters many beings and has many interesting experiences. In the end when he returns to the nest, he finds his mother waiting for him.

# तूच का ग माझी आई ?

पी. डी. ईस्टमन



# Are You My Mother?

**P.D. Eastman**

Are You My Mother ? : P. D. Eastman
अनुवाद ''क्या तुम मेरी माँ हो ?: अरविंद गुप्ता
तूच का ग माझी आई ? : शोभा भागवत

कृतज्ञता : अरविंद गुप्ता
भारत ज्ञान विज्ञान समिती

आभार व ग्राफिक्स : अभय कुमार झा

मराठी अनुवाद : शोभा भागवत

मुद्रक : स्क्रिप्ट आर्ट
९१४ सदाशिव पेठ,
पुणे - ४११ ०३०.

प्रकाशनवर्ष : २००४

मूल्य : रु. १५/-

मराठी प्रकाशन -
**कजा कजा मरू प्रकाशन**
द्वारा : गरवारे बालभवन
सारसबागेसमोर, पुणे - ४११ ००२.
फोन : २४४४२१०९.

# तूच का ग माझी आई ?

एक चिमणी आपल्या घरट्यात अंड्यावर बसली होती.



## Are You My Mother?

A mother bird sat on her egg.

अचानक अंड्यानी हवेत उडी मारली.



The egg jumped.



" अरे वा !" चिमणी म्हणाली,
"आता थोड्या वेळानी अंड्यातून माझं पिल्लू बाहेर
येईल; मग त्याला खूप भूक लागेल"



"Oh oh!" said the mother bird.
"My baby will be here! He will want to eat."

इकडे अंड्यानी खूप उड्या मारल्या
इतक्या उड्या मारल्या, इतक्या उड्या मारल्या !



The egg jumped.
It jumped, and jumped, and jumped!



की त्यातून चिमणीचं पिल्लू
बाहेर आलं.



Out came the baby bird!

पिलू म्हणालं, "माझी आई कुठे आहे ?"



"Where is my mother?" he said.



त्याने आईला सगळीकडे शोधलं.



He looked for her.

त्यानी वर पाहिलं पण त्याला काही त्याची आई दिसली नाही.



He looked up. He did not see her.



त्यानी खाली पाहिलं पण आई काही दिसलीच नाही.



He looked down. He did not see her.

"चला, आता मी आईला शोधायला निघतो."
ते पिल्लू म्हणालं.



"I will go and look for her," he said.



असं म्हणून ते पिल्लू घरट्याबाहेर पडलं.



So away he went.

ते झाडावरून खाली पडलं.



Down, out of the tree he went.



झाडावरून खाली, खाली, खाली पडलं.



Down, down, down! It was a long way down.

चिमणीचं पिल्लू इतकं छोटं होतं की,
त्याला उडता येत नव्हतं.



The baby bird could not fly.



त्याला उडता येत नव्हतं पण चालता येत होतं.
ते म्हणालं, "चला आता, आईला शोधून काढायला
मी निघतो."



He could not fly, but he could walk.
"Now I will go and find my mother," he said.

त्यानी आईला कधी पाहिलेलं नव्हतं.
ते आपल्या आईला ओळखतही नव्हतं.
चालता चालता ते आपल्या आईजवळून पुढे गेलं
पण त्यानी आईला ओळखलंच नाही.



He did not know
what his mother looked like.
He went right by her.
He did not see her.



मग ते एका छोट्या मांजरीजवळ पोचलं. त्यानी
ह्या मांजरीला विचारलं, "तूच का ग माझी आई ?"
मांजरीनी त्याच्याकडे नुसतंच डोळे मोठे करून
पाहिलं. ती बघतच बसली काही बोललीच नाही.



He came to a kitten.
"Are you my mother?" he said to the kitten.
The kitten just looked and looked.
It did not say a thing.



मांजरी काही त्याची आई नव्हती
म्हणून चिमणीचं पिल्लू पुढे गेलं.
मग ते एका कोंबडीजवळ पोचलं.
"तूच का ग माझी आई ?"
त्याने कोंबडीला विचारलं.
'नाही' कोंबडीने उत्तर दिलं.



The kitten was not his mother,
so he went on.
Then he came to a hen.
"Are you my mother?" he said to the hen.
"No," said the hen.



छोटी मांजरी त्याची आई नव्हती;
कोंबडीपण त्याची आई नव्हती;
म्हणून चिमणीचं पिल्लू पुढे गेलं. "मला माझ्या
आईला शोधायचंय" ते म्हणालं, "पण कुठे आहे
माझी आई ? कुठे शोधू तिला ? कुठे मिळेल ती ?"







The kitten was not his mother.
The hen was not his mother.
So the baby bird went on.
"I have to find my mother!" he said.
"But where? Where is she?
Where could she be?"

मग ते पोचलं एका कुत्र्यापाशी
"तूच का ग माझी आई ?"
त्याने कुत्र्याला विचारलं.



Then he came to a dog.
"Are you my mother?"
he said to the dog.



"मी तुझी आई नाही.
मी कुत्रा आहे." कुत्र्यानी सांगितलं.



"I am not your mother.
I am a dog," said the dog.

छोटी मांजरी पिल्लाची आई नव्हती.
कोंबडीपण त्याची आई नव्हती.
कुत्रापण त्याची आई नव्हता.



The kitten was not his mother.
The hen was not his mother.
The dog was not his mother.



त्यामुळे चिमणीचं पिल्लू पुन्हा पुढे गेलं.
त्याला एक गाय भेटली.



So the baby bird went on.
Now he came to a cow.

"तूच का ग माझी आई ? त्यानी गाईला विचारलं.
"मी कशी तुझी आई असेन ?"
गाय म्हणाली, "मी तर गाय आहे"



"Are you my mother?" he said to the cow.
"How could I be your mother?" said the cow.
"I am a cow."



छोटी मांजरी आणि कोंबडी त्याची आई नव्हत्या;
कुत्रा आणि गायसुद्धा त्याची आई नव्हते.



The kitten and the hen were not his mother.
The dog and the cow were not his mother.

खरंच त्याची आई होती का ?
"माझी आई होती" चिमणीचं पिल्लू म्हणालं.
"मला पक्कं माहीत आहे. मला तिला शोधावंच
लागेल आणि मी तिला शोधूनच काढीन. नक्की !"



Did he have a mother?
"I did have a mother," said the baby bird.
"I know I did. I have to find her. I will.
I WILL."



आता चिमणीच्या पिलानी चालणं सोडून दिलं.
ते धावायला लागलं.
त्याला एक मोडकी तोडकी मोटार दिसली.
मोटारगाडी असेल का माझी आई ?
नाही; नसेलच. चिमणीचं पिल्लू थांबल नाही.
जोरानी पुढे धावत राहिलं.



Now the baby bird did not walk. He ran!
Then he saw a car.
Could that old thing be his mother?
No, it could not.
The baby bird did not stop. He ran on and on.

मग त्यानी सहज खाली वाकून पाहिलं त्याला एक बोट दिसली. बोटीला पाहून ते म्हणालं, "हं ! हीच माझी आई !" त्यानी बोटीला हाका मारल्या; पण बोट काही थांबली नाही, पुढे निघून गेली.



Now he looked way, way down. "There she is!" said the baby bird. He called to the boat, but the boat did not stop.The boat went on.



मग त्यानी मान वर करून पाहिलं. त्याला एक मोठं विमान दिसलं. "आई, मी इथे आहे", ते जोरात ओरडलं. पण विमान काही थांबलं नाही. ते निघून गेलं.



He looked way, way up. He saw a big plane. "Here, I am, Mother," he called out. But the plane did not stop. The plane went on.

तेवढ्यात चिमणीच्या पिल्लाला एक काहीतरी मोठी
वस्तू दिसली. हीच माझी आई असणार.
"आई तिकडे आहे." ते ओरडलं
"ती माझी आई आहे."







Just then, the baby bird saw a big thing.
This must be his mother!
"There she is!" he said. "There is my mother!"



ते धावत धावत एकदम त्या मोठ्या वस्तूजवळ आलं.
"आई, आई, मी इथे आहे आई" त्यानी त्या मोठ्या
यंत्राला सांगितलं; पण त्या यंत्रानी 'भक' असा
जोरात आवाज केला. "बापरे ! तू नाहीस माझी
आई." चिमणीचं पिल्लू म्हणालं.



He ran right up to it.
"Mother, Mother! Here I am, Mother!"
he said to the big thing. But the big thing just
said Snort. " "Oh, you are not my mother,"
said the baby bird.

"तू तर एक मोठं यंत्र आहेस. मला आता इथून
बाहेर जायचंय" पण चिमणीच्या पिलाला तिथून कुठे
जाताच येईना. ते यंत्र म्हणजे एक क्रेन होती.
ती वर वर गेली;
आणि तिच्या बरोबर चिमणीचं पिल्लू
पण वर वर गेलं.



"You are a Snort.
I have to get out of here."
But the baby bird could not get away.
The Snort went up.
It went way, way up.
And up, up, up went the baby bird.



पिलाला कळेना की ही क्रेन कुठे चाललीय् ! '
अरे बापरे !'
"आता हे यंत्र मला काय करेल ?
मला कोणीतरी सोडवा ! वाचवा !"



But now, where was the Snort going?
"Oh, oh, oh!
What is this Snort going to do to me?
Get me out of here!"

तेवढ्यात ते यंत्र थांबलं.



Just then the Snort came to a stop.



'मी कुठे आहे ?' पिलानी विचारलं
"मला घरी जायचंय.
मला माझी आई पाहिजे."



"Where am I?" said the baby bird.
"I want to go home! I want my mother!"

तेवढ्यात काय गंमत झाली !
त्या मोठ्या यंत्रानी पिलाला उचलून
परत घरट्यात ठेवलं आणि
पिलू परत आपल्या घरात
सुखरूप पोचलं.



Then something happened.
The Snort put that baby bird
right back in the tree.
The baby bird was home!



नेमकी तेव्हाच चिमणी झाडावर परत आली.
तिने आपल्या पिलाला विचारलं,
"तुला माहीत आहे का मी कोण आहे ते ?"



Just then the mother bird came back to the tree.
"Do you know who I am?"
she said to her baby.





"हो मला माहितीयं तू कोण आहेस ते.
चिमणीचं पिल्लू म्हणालं, "तू छोटी मांजरी नाहीस;
तू कोंबडी नाहीस;
तू कुत्रा नाहीस;
तू गाय नाहीस;
तू बोट नाहीस किंवा तू विमानपण नाहीस;
तू ते मोठं यंत्रपण नाहीस;
तू चिमणी आहेस आणि तूच
माझी आई आहेस."

❏❏❏

"Yes, I know who you are,"
said the baby bird.
"You are not a kitten.
You are not a hen.
You are not a dog.
You are not a cow.
You are not a boat, or a plane or a Snort!
You are a bird, and you are my mother."

❏❏❏